नियोजन विभागांतर्गत संगणकीकरण प्रकल्प अंमलबजावणीसाठी स्थापित समितीची पुनर्रचना करणेबाबत.

महाराष्ट्र शासन
नियोजन विभाग
शासन निर्णय, क्र. संकीर्ण-२०१८/प्र.क्र.८०/का.१४२६
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक : १ नोव्हेंबर, २०१८.

संदर्भ:-

१) सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्र. सीओएम-१००१/प्र.क्र.१७४/०१/३९, दिनांक २९/१०/२००१.
२) सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्र. सीओएम-१००१/प्र.क्र.१७४/०१/३९, दिनांक २८/३/२००५.
३) नियोजन विभाग, शासन निर्णय क्र. एफएनएस-३३०५/प्र.क्र.१४२/का.१४२६, दिनांक १०/१/२००६.
४) नियोजन विभाग, शासन निर्णय क्र. एफएनएस-३३०५/प्र.क्र.१४२ (अ) /का.१४२६, दिनांक १८/१०/२००६
५) सामान्य प्रशासन विभाग (मातं), शासन निर्णय क्र. मातंस-२०११/प्र.क्र.१२५/३९, दिनांक २३/९/२०११.

प्रस्तावना :-

नियोजन विभागाच्या अधिपत्याखालील अर्थ व सांख्यिकी संचालनालयातील संगणक कार्यप्रणाली अद्ययावत करण्यासाठी संदर्भाधीन क्र. ३ येथील शासन निर्णयाद्वारे प्रधान सचिव, नियोजन विभाग यांच्या अध्यक्षतेखाली समिती स्थापन करण्यात आली होती. सदर समितीला संदर्भाधीन क्र. १ येथील शासन निर्णयातील निर्देशांच्या अनुषंगाने संदर्भाधीन क्र. ४ येथील शासन निर्णयान्वये नियोजन विभागाची “प्रकल्प अंमलबजावणी समिती” म्हणून घोषित करण्यात आले आहे. आता, संदर्भाधीन क्र. १ येथील शासन निर्णयातील परिच्छेद ७.१ नुसार आणि संदर्भाधीन क्र. ५ येथील शासन निर्णयातील परिच्छेद क्र १२.३, १२.४ नुसार "प्रकल्प अंमलबजावणी समिती" पुनर्रचना कक्षात अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव, उद्योग विभाग यांचे तसेच (१) संचालक, महाराष्ट्र सुदूर संवेदन उपयोजन केंद्र, नागपूर, (२) राज्य सूचना विज्ञान अधिकारी, राष्ट्रीय सूचना विज्ञान केंद्र, मुंबई यांचा "माहिती व तंत्रज्ञान" या क्षेत्राचे निमंत्रित सदस्य म्हणून समावेश करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

नियोजन विभागाच्या अधिपत्याखालील अर्थ व सांख्यिकी संचालनालयातील संगणकीकरण प्रकल्प अंमलबजावणीसाठी संदर्भ क्र. ४ येथील शासन निर्णयान्वये घोषित “प्रकल्प अंमलबजावणी समिती” ची पुढीलप्रमाणे पुनर्रचना करण्यात येत आहे :-

| | | |
|---|---|---|
| १) | अपर मुख्य सचिव / प्रधान सचिव / सचिव , नियोजन विभाग | अध्यक्ष |
| २) | अपर मुख्य सचिव / प्रधान सचिव / सचिव, वित्त विभाग | सदस्य |
| ३) | अपर मुख्य सचिव / प्रधान सचिव / सचिव, उद्योग विभाग | सदस्य |
| ४) | अपर मुख्य सचिव / प्रधान सचिव / सचिव , माहिती तंत्रज्ञान | सदस्य |
| ५) | राज्य सूचना विज्ञान अधिकारी, राष्ट्रीय सूचना विज्ञान केंद्र, मुंबई | निमंत्रित सदस्य |
| ६) | संचालक, महाराष्ट्र सुदूर संवेदन उपयोजन केंद्र, नागपूर | निमंत्रित सदस्य |
| ७) | संचालक, अर्थ व सांख्यिकी संचालनालय, मुंबई | सदस्य |
| ८) | अपर संचालक (इआसंके), अर्थ व सांख्यिकी संचालनालय, मुंबई | सदस्य |
| ९) | सहसचिव / उपसचिव (प्रशासन), नियोजन विभाग | सदस्य |
| १०) | सहसचिव / उपसचिव (संबंधित कार्यासन), नियोजन विभाग | सदस्य सचिव |

२. नियोजन विभागाच्या प्रकल्प अंमलबजावणी समितीस माहिती व तंत्रज्ञान प्रकल्प व संगणकीकरणाच्या कामाची अंमलबजावणी करण्यासाठी आवश्यक ते हार्डवेअर/सॉप-टवेअर उपलब्ध करण्याकरिता पुरवठादार/सल्लागाराची निवड व इतर अनुषंगिक बाबी याबाबत निर्णय घेण्याचे अधिकार राहतील. सदर शासन निर्णयानुसार गठीत करण्यात आलेल्या प्रकल्प अंमलबजावणी समितीने मान्यता दिल्यानंतर संगणकीकरण व तद्नुषंगिक बाबी म्हणजेच संगणक इत्यादि आवश्यक यंत्र सामुग्रीची खरेदी तसेच संगणक प्रणालीचे विकसन उपरोक्त संदर्भाधिन शासन निर्णयानुसार व वेळोवेळी संबंधित प्रशासकीय विभागाकडून निर्गमित झालेल्या शासन निर्णय/परिपत्रकांनुसार निश्चित केलेल्या व खरेदी संदर्भात शासनाच्या धोरणानुसार करण्यात यावे.

३. नियोजन विभागाच्या प्रकल्प अंमलबजावणी समितीच्या बैठका आवश्यकतेनुसार घेण्यात याव्यात.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून, त्याचा संगणक संकेतांक २०१८११०११६३८४३६२१६ असा आहे. सदर शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकीत करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशांनुसार व नांवाने,

Priyanka Ranjan Chhapwale

Digitally signed by Priyanka Ranjan Chhapwale
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Planning Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=2295c5c50b6a2aa03b2654fd2f5f69a709a20ae44359c483f3e1b0d4450728d0, cn=Priyanka Ranjan Chhapwale
Date: 2018.11.01 16:44:27 +05'30'

**(प्रियांका छापवाले)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मुख्यमंत्री यांचे कार्यालय, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
२) मा. विरोधी पक्ष नेता (विधानपरिषद / विधानसभा) यांचे स्वीय सचिव, विधानमंडळ, मुंबई.
३) मा. मंत्री / राज्यमंत्री (वित्त व नियोजन) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
४) मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन, मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
५) अपर मुख्य सचिव / प्रधान सचिव / सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
६) अपर मुख्य सचिव / प्रधान सचिव / सचिव, उद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
७) अपर मुख्य सचिव / प्रधान सचिव / सचिव, माहिती तंत्रज्ञान, मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
८) राज्य सूचना विज्ञान अधिकारी, राष्ट्रीय सूचना विज्ञान केंद्र

९) संचालक, महाराष्ट्र सुदूर संवेदन उपयोजन केंद्र, नागपूर.
१०) संचालक, अर्थ व सांख्यिकी संचालनालय, मुंबई.
११) अपर संचालक (इआसंके), अर्थ व सांख्यिकी संचालनालय, मुंबई.
१२) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१/२, मुंबई / नागपूर.
१३) महालेखापाल (लेखापरीक्षा), महाराष्ट्र-१/२, मुंबई / नागपूर.
१४) संचालक, लेखा व कोषागारे संचालनालय, मुंबई.
१५) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई / लेखाकोष भवन, बांद्रा (पूर्व), मुंबई.
१६) निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
१७) निवडनस्ती-का.१४२६.